**भारतरत्न डॉ. बाबासाहेब आंबेडकर यांच्या १२५ व्या जयंती वर्षानिमित्त अनुसूचित जाती व नवबौध्द घटकांसाठी ऐतिहासिक व सांस्कृतिकदृष्ट्या महत्वाची ठिकाणे / स्थळांचा विकास करण्यासाठी निधी वितरणाबाबत-**

**महाराष्ट्र शासन**
**सामाजिक न्याय व विशेष सहाय्य विभाग,**
**शासन निर्णय क्रमांक : बैठक-२०१६/प्र.क्र.४७५/बांधकामे**
मंत्रालय, मुंबई - ४०० ०३२.
दिनांक : २४ मार्च, २०१७

**<u>संदर्भ</u>** :- १.शासन निर्णय, सामाजिक न्याय व विशेष सहाय्य विभाग, क्रमांक सान्यावि २०१५/ प्र.क्र. १६३ / बांधकामे, दि. ९ ऑक्टोबर, २०१५.
२.शासन निर्णय, सामाजिक न्याय व विशेष सहाय्य विभाग, क्रमांक बीसीएच २०१४/प्र.क्र.६१/ बांधकामे, दि. १६ डिसेंबर, २०१५.
३.शासन पत्र,सामाजिक न्याय व विशेष सहाय्य विभाग,क्रमांक बैठक २०१६/प्र.क्र.७६/बांधकामे (शिकाना) दि.२३.१२.२१०६

**प्रस्तावना :-**

भारतरत्न डॉ. बाबासाहेब आंबेडकर यांचे सामाजिक, राजकीय व आर्थिक क्षेत्रातील योगदान व आधुनिक भारत घडविण्यामध्ये त्यांचा मोलाचा सहभाग या प्रति कृतज्ञता व्यक्त करण्यासाठी आणि त्यांच्या संघर्षाची समाजाला प्रेरणा मिळावी यासाठी दिनांक १४ एप्रिल, २०१५ ते १४ एप्रिल, २०१६ हे वर्ष "समता व सामाजिक न्याय वर्ष" म्हणून साजरे करण्यास संदर्भ क्र.१ येथील शासन निर्णयान्वये मान्यता देण्यात आलेली आहे. सदर शासन निर्णयातील कार्यक्रम भाग १ मधील अनुक्रमांक ६ अनुसार डॉ. बाबासाहेब आंबेडकर यांच्या जीवनाशी निगडीत असलेल्या स्थळांचा विकास करणे, अनुसूचित जाती व नवबौध्द घटकातील ऐतिहासिक व सांस्कृतिकदृष्ट्या महत्वाची ठिकाणे / स्थळांचा विकास करणे याचा समावेश करण्यात आला आहे.

२. संदर्भ क्र.१ अन्वये,मा. मंत्री(सामाजिक न्याय व विशेष सहाय्य) यांच्या अध्यक्षतेखाली गठीत करण्यात आलेल्या समितीच्या दि. १ ऑगस्ट २०१६ रोजी झालेल्या बैठकीचे इतिवृत्त संदर्भ क्र.३ येथील पत्रान्वये निर्गमित करण्यात आले आहे.सदर इतिवृत्तासोबतच्या परिशिष्ट "अ" नुसार अनुसूचित जाती व नवबौध्द घटकांसाठी ऐतिहासिक व सांस्कृतिक दृष्टया महत्त्वाच्या असलेल्या एकूण २८ ठिकाणांची यादी अंतिम करण्यात आली आहे.सदर ठिकाणांच्या विकासासाठी विविध स्वयंसेवी संस्थांकडुन/नगर परिषद/नगरपालिका/ग्रामपंचायत इ.कडुन प्राप्त झालेल्या प्रस्तावांना समितीने दिलेल्या मान्यतेनुसार सदर कामांना लागणाऱ्या निधी वितरणाची बाब शासनाच्या विचाराधीन होती.

**शासन निर्णय :-**

भारतरत्न डॉ. बाबासाहेब आंबेडकर यांच्या १२५ व्या जयंती वर्षानिमित्त अनुसूचित जाती व नवबौध्द घटकांसाठी ऐतिहासिक व सांस्कृतिकदृष्ट्या महत्वाची असलेली ठिकाणे / स्थळांचा विकास करण्यासाठी सन २०१६-१७ च्या अर्थसंकल्पात "मागणी क्र. एन-३, २२२५-अनुसूचित जाती अनुसूचित जमाती व इतर मागासवर्गीय व अल्पसंख्यांक यांचे कल्याण, ०१-अनुसूचित जातीचे कल्याण, ७८९-अनुसूचित जाती घटक योजना, ०२-भारतरत्न डॉ. बाबासाहेब आंबेडकर यांची १२५ वी जयंती साजरी करणे (योजनांतर्गत-दत्तमत) लेखाशीर्ष २२२५D८२३" या लेखाशीर्षाखाली रू.१७० कोटी (रू.एकशे सत्तर कोटी फक्त) निधी अर्थसंकल्पित करण्यात आला आहे.यातील रू.२५ कोटी इतका निधी अनुसूचित जाती व नवबौध्द घटकांसाठी ऐतिहासिक व सांस्कृतिकदृष्ट्या महत्वाची असलेली ठिकाणे / स्थळांचा विकास करण्यासाठी राखीव आहे.

**२.** उपरोक्तपणे सन २०१६-१७ या आर्थिक वर्षात उपलब्ध अर्थसंकल्पित रू.१७० कोटी नियतव्ययातील ८० % निधी रू.१३६ कोटी नियंत्रक अधिकारी,आयुक्त,समाजकल्याण,पुणे यांना वितरीत करण्यात आला आहे.सदर निधी आयुक्त,समाजकल्याण,पुणे यांच्या अधिनस्त आहे. संदर्भ क्र.१ येथील शासन निर्णयान्वये गठीत समितीच्या दि.१ ऑगस्ट २०१६ रोजी झालेल्या बैठकीत देण्यात आलेल्या मान्यतेनुसार,सोबतच्या विवरणपत्र "अ" मध्ये दर्शविल्यानुसार,सन २०१६-१७ या आर्थिक वर्षात अनुसूचित जाती व नवबौध्द घटकांसाठी ऐतिहासिक व सांस्कृतिकदृष्ट्या महत्वाची असलेली ठिकाणे / स्थळांचा विकास करण्यासाठी उपलब्ध रू.२५ कोटी तरतूदीपैकी,नियंत्रक अधिकारी आयुक्त,समाजकल्याण,पुणे या कार्यालयास वितरीत करण्यात आलेली ८०% तरतूद रू.२० कोटी (रूपये वीस कोटी फक्त) तरतूद आयुक्त,समाजकल्याण,पुणे यांनी आहरीत करून सदरहू तरतूद ठेव अंशदान स्वरूपात समन्वयक तथा कार्यकारी अभियंता,सार्वजनिक बांधकाम विभाग,पुणे यांच्या अधिनस्त ठेवण्यास या शासन निर्णयान्वये मान्यता देण्यात येत आहे. यानुसार आयुक्त,समाजकल्याण,पुणे यांनी कार्यवाही करावी.

**३.** संदर्भ क्र.३ अन्वये अंतिम करण्यात आलेल्या २८ स्थळे / ठिकाणे याबाबतचे सविस्तर प्रस्ताव हे संदर्भ क्र.२ येथील, शासन निर्णय, सामाजिक न्याय व विशेष सहाय्य विभाग क्रमांक बीसीएच - २०१४ / प्र.क्र. ६१ / बांधकामे, दिनांक १६ डिसेंबर, २०१५ मधील २ (१) अन्वये ठरविण्यात आलेल्या निकष व मार्गदर्शक तत्वानुसार विहीत मार्गाने आयुक्त, समाजकल्याण, महाराष्ट्र राज्य, पुणे यांच्यामार्फत शासनास सादर करण्यात यावेत. या अंतर्गत निवड केलेल्या व मान्यता दिलेल्या ठिकाण / स्थळांच्या प्रस्तावास स्वतंत्रपणे तांत्रिक व प्रशासकीय मान्यता देण्यात येईल.निधीचे वाटप व निधी वितरणाचे नियम संदर्भ क्र.२ येथील शासन निर्णयातील अटी व शर्तीनुसार राहतील.उपरोक्तपणे सार्वजनिक बांधकाम विभागाच्या अधिनस्त ठेवण्यात आलेल्या निधीतून, करण्यात आलेल्या कामांच्या प्रगतीचा व खर्चाचा अहवाल कार्यकारी अभियंता,सार्वजनिक बांधकाम विभाग,पुणे यांनी यांनी वेळोवेळी शासनास सादर करावा.

४. यावरील खर्च हा “मागणी क्र. एन-३, २२२५-अनुसूचित जाती अनुसूचित जमाती व इतर मागासवर्गीय व अल्पसंख्यांक यांचे कल्याण, ०१-अनुसूचित जातीचे कल्याण, ७८९-अनुसूचित जाती घटक योजना, ०२-भारतरत्न डॉ. बाबासाहेब आंबेडकर यांची १२५ वी जयंती साजरी करणे (योजनांतर्गत-दत्तमत) लेखाशीर्ष २२२५D८२३” या लेखाशीर्षाखाली सन २०१६-१७ साठी मंजूर करण्यात आलेल्या तरतूदीतून खर्ची टाकण्यात यावा.यासाठी आयुक्त,समाजकल्याण,पुणे यांना आहरण व संवितरण अधिकारी म्हणून घोषित करण्यात येत आहे.

५. प्रस्तुतचा शासन निर्णय भारतरत्न डॉ. बाबासाहेब आंबेडकर यांच्या १२५ व्या जयंती निमित्त करावयाच्या कार्यक्रमाकरीता मा. मंत्री, सामाजिक न्याय व विशेष सहाय्य यांच्या अध्यक्षतेखाली गठीत करण्यात आलेल्या समितीस संदर्भ क्र.१ येथील शासन निर्णयान्वये दिलेल्या अधिकारानुसार तसेच वित्तिय अधिकार,नियम पुस्तिका,१९७८,भाग पहिला,उपविभाग-पाच,अनुक्रमांक १ महाराष्ट्र सार्वजनिक बांधकाम नियम पुस्तिकेतील परि.क्र.१३४ खाली प्रशासकीय विभागास प्रदान करण्यात आलेल्या अधिकारास अनुसरून निर्गमित करण्यात येत आहे.

६. हा शासन निर्णय महाराष्ट्र शासनाच्या www.maharashtra.gov.in या संकेतस्थळावर उपलब्ध करण्यात आला असून त्याचा संकेतांक २०१७०३२४१२१९४६७१२२ असा आहे. हा आदेश डिजीटल स्वाक्षरीने साक्षांकीत करुन काढण्यात येत आहे.

महाराष्ट्राचे राज्यपाल यांच्या आदेशानुसार व नावाने,

Anil Kondaji Ahire

Digitally signed by Anil Kondaji Ahire
DN: c=IN, o=Government of Maharashtra, ou=Social Justic and Special Assistance Department, postalCode=400032, st=Maharashtra, 2.5.4.20=d81b5c910bad5837d7f88ac97a75b312f0e57 44ecbdc45b7704dcb27f5d4dfef, cn=Anil Kondaji Ahire
Date: 2017.03.24 12:20:26 +05'30'

(अ.कों.आहिरे)

अवर सचिव, महाराष्ट्र शासन

**प्रत,**

१) मा. राज्यपाल यांचे सचिव, राजभवन, मलबार हिल, मुंबई.
२) मा. मुख्यमंत्री यांचे खाजगी सचिव, मंत्रालय, मुंबई.
३) मा. विरोधी पक्ष नेता, विधान सभा, विधान परिषद, विधानमंडळ, मुंबई.
४) सर्व सन्माननीय संसद सदस्य, विधानमंडळ सदस्य, महाराष्ट्र राज्य.
५) महालेखापाल, महाराष्ट्र-१, मुंबई / महाराष्ट्र-२, नागपूर.
६) प्रधान सचिव,सार्वजनिक बांधकाम विभाग,मंत्रालय,मुंबई-४०००३२
७) आयुक्त, समाजकल्याण, महाराष्ट्र राज्य, पुणे.
८) महासंचालक,डॉ बाबासाहेब आंबेडकर संशोधन व प्रशिक्षण केंद्र पुणे.,
९) मा. मंत्री, सामाजिक न्याय व विशेष सहाय्य यांचे खाजगी सचिव
१०) मा. राज्यमंत्री, सामाजिक न्याय व विशेष सहाय्य यांचे खाजगी सचिव
११) सर्व प्रादेशिक उपायुक्त, समाजकल्याण, पुणे.
१२) सर्व सहायक आयुक्त, समाजकल्याण
१३) सर्व जिल्हा कोषागार अधिकारी
१४) निवडनस्ती, कार्यासन-बांधकामे, सामाजिक न्याय व विशेष सहाय्य विभाग, मुंबई.

## शासन निर्णय,सामाजिक न्याय व विशेष सहाय्य विभाग क्र.बैठक २०१६/प्र.क्र.४७५/बांधकामे दि.२४ मार्च २०१७ चे

## परिशिष्ट "अ"

**अनुसूचित जाती व नवबौध्द घटकांसाठी ऐतिहासिक व सांस्कृतिक दृष्ट्या महत्वाची असलेल्या ठिकाणांची यादी.**

| अ. क्र. | ऐतिहासिक / सांस्कृतिक स्थळाचे / स्मारकाचे नांव | कामाचे स्वरुप | अंदाजित किंमत |
|---|---|---|---|
| १ | महाड चवदार तळे, महाड, जि. रायगड | परिसराचे सुशोभिकरण व डॉ. बाबासाहेब आंबेडकर सभागृहाचे नुतनीकरण | रू १.०० कोटी |
| २ | चरी ता. अलिबाग, जि. रायगड | ग्रंथालय, वाचनालय, सभागृह इत्यादी | रू १.०० कोटी |
| ३ | माता रमाई स्मारक स्मशानभूमी, वरळी, जि. मुंबई | सुशोभिकरण इत्यादी | रू १.०० कोटी |
| ४ | डॉ. बाबासाहेब आंबेडकर स्मारक समिती, किन्हवली, ता. शहापूर, जि. ठाणे | स्मारक उद्यान, सांस्कृतिक भवन इत्यादी | रू ६३ लाख |
| ५ | क्रांतीस्तंभ, महाड, जि. रायगड (महाडची क्रांतीभूमी) | शाहू महाराज सभागृह नुतनीकरण | रू १.०० कोटी |
| ६ | कान्फाईकोंड, दापोली, जि. रत्नागिरी | ऐतिहासिक स्थळाचा विकास करणे | रू ५० लाख |
| ७ | आंबावडे, ता. मंडणगड, जि. रत्नागिरी | ऐतिहासिक स्थळाचा विकास करणे | रू २.०० कोटी |
| ८ | वणंद, ता. दापोली, जि. रत्नागिरी (माता रमाई यांचे जन्मस्थान) | ऐतिहासिक स्थळाचा विकास करणे | रू २ .००कोटी |
| ९ | डॉ. बाबासाहेब आंबेडकर यांनी दि. १६ ऑक्टोबर, १९५६ रोजी चंद्रपूर येथे दिलेली दिक्षा, जि. चंद्रपूर | परिसराचे सुशोभिकरण इत्यादी | रू २.०० कोटी |
| १० | बौध्दविहार, भीमघाट, जि. गोंदिया | नुतनीकरण इत्यादी | रू १.०० कोटी |
| ११ | धम्मकुटी, डव्वा, पळसगाव, जि. गोंदिया | नुतनीकरण इत्यादी | रू ५० लाख |
| १२ | दिक्षाभूमी, देसाईगंज, जि. गडचिरोली | परिसराचे सुशोभिकरण इत्यादी. | रू ५० लाख |
| १३ | बौध्दविहार, कालीमाटी, अर्जूनीमोर, ता. सडक अर्जूनी, जि. गोंदिया | नुतनीकरण इत्यादी | रू ५० लाख |
| १४ | मेव्हणा राजा, ता. देऊळगाव राजा, जि. बुलडाणा (चोखामेळा जन्मस्थान) | परिसराचे सुशोभिकरण इत्यादी | रू ५० लाख |

| | | | |
|---|---|---|---|
| १५ | पातुर्डा, ता. संग्रामपूर, जि. बुलडाणा (मातीचा बौध्दविहार) | नुतनीकरण इत्यादी | रू १.०० कोटी |
| १६ | पुर्णा, बौध्दविहार, जि.परभणी | नुतनीकरण इत्यादी | रू १.०० कोटी |
| १७ | तदवळे, ता.जि. उस्मानाबाद (बैलगाडी) | सार्वजनिक वाचनालय व इतर | रू १.०० कोटी |
| १८ | मिलिंद कॉलेज,जि.औरंगाबाद | मध्यवर्ती अभ्यासिका व वाचनालय | रू.२.०० कोटी |
| १९ | तळेगाव दाभाडे, जि. पुणे (बाबासाहेबांचे घर) | डॉ. बाबासाहेब आंबेडकर यांनी वास्तव्य केलेल्या सध्याची बंगल्याची डागडुजी व सुशोभिकरण करणे इत्यादी. | रू १.०० कोटी |
| २० | लहुजी वस्ताद साळवे यांचे स्मारक, संगमवाडी, जि. पुणे | लहुजी वस्ताद साळवे यांचे स्मारक विकसीत करणे. | रू २.०० कोटी |
| २१ | बौध्दविहार, देहू रोड, जि. पुणे | परिसराचे सुशोभिकरण, नुतनीकरण इत्यादी. | रू ५० लाख |
| २२ | सावित्रीबाई फुले जन्मगाव,नायगांव, जि. सातारा | --- | रू ₹ ५० लाख |
| २३ | एलिमेंटरी स्कुल, जि. सातारा | वाचनालय व ग्रंथालय | रू ५० लाख |
| २४ | डॉ. बाबासाहेब आंबेडकर यांच्या मातोश्री भिमाबाई यांची समाधी, सातारा जि. सातारा | स्मारक बांधकाम इत्यादी | रू २.६३ कोटी |
| २५ | माणगाव, ता. हातकणंगले, जि. कोल्हापूर | -- | रू २.०० कोटी |
| २६ | वाटेगाव, ता. वाळवा, जि. सांगली | लोकशाहीर अण्णाभाऊ साठे यांचे स्मारक इत्यादी | रू ५० लाख |
| २७ | बौध्दविहार,कॅम्प,पुणे | -- | रू ५० लाख |
| २८ | मौजे हरेगाव ता.श्रीरामपूर जि.अहमदनगर | डॉ.बाबासाहेब आंबेडकर स्मारकाबाबत | रू ९५ लाख |
| | | एकूण | रू ३०.२१ कोटी |

(अक्षरी रुपये तीस कोटी एकवीस लक्ष फक्त)